**जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत नंदूरबार, गडचिरोली आणि अमरावती या तीन जिल्ह्यांकरिता फिरत्या प्रयोगशाळा (Mobile Laboratory) प्रायोगिक तत्वावर स्थापन करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम- २०२३/प्र. क्र.९५/पापु-१२**
**७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१**
**तारीख: २० जून, २०२४.**

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांक: जजीमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु-१० (०७), दिनांक ०४ सप्टेंबर, २०२०.

२) अवर सचिव, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र. W-११०२०/१९७/२०१५-WATER-I/१३, दिनांक १८ जुलै, २०२३ व आदेश क्र. W-११०२०/१९७/२०१५-WATER-I/३२, दिनांक ०६ सप्टेंबर, २०२३

३) शासन निर्णय क्रमांकः जजीमि-२०२३/प्र. क्र.३३१/पापु-१०, दिनांक ०१ ऑगस्ट, २०२३ व दिनांक ०१ ऑक्टोबर, २०२३

४) अभियान संचालक (जजीमि),राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन,बेलापूर यांचे पत्र.क्र. रापास्वमि/पागुशा ११२३/ प्र. क्र. २३/२०२३-२४/२१५०, दिनांक १२ डिसेंबर २०२३.

५) आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र जा.क्र. भूसविय/पा.गु./प्रयोग/ Mobile lab /प्रशा. मान्यता/६६८/२०२४, दिनांक २७ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना**

राज्यामध्ये जल जीवन मिशन कार्यक्रम राबविण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनामार्फत प्राप्त निधीपैकी २% निधी, पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण घटकाखाली स्वतंत्रपणे तरतूद करणेबाबत, जल जीवन मिशन कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांमध्ये

नमूद करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील आदेशान्वये जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण घटकाखालील केंद्र/राज्य हिस्सा निधी, राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन, बेलापूर कार्यालयास वितरित करण्यात आला आहे.

जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत पाणी गुणवत्ता तपासणीसाठी नंदूरबार, गडचिरोली आणि अमरावती या तीन जिल्ह्यांकरिता फिरत्या प्रयोगशाळा ( Mobile Laboratory) प्रायोगिक तत्वावर खरेदी करण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव, आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ५ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. याकरिता आवश्यक निधी एकूण रू.३००.०० लक्ष (केंद्र हिस्सा ६० टक्के रू.१८०.०० लक्ष व राज्य हिस्सा रू.१२०.०० लक्ष) अभियान संचालक (जजीमि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर कार्यालयाने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दिनांक १२ डिसेंबर २०२३ रोजीच्या आदेशान्वये, आयुक्त, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य पुणे यांना वितरित केला आहे. त्यास अनुसरून नंदूरबार, गडचिरोली आणि अमरावती या तीन जिल्ह्यांकरिता फिरत्या प्रयोगशाळा ( Mobile Laboratory) प्रायोगिक तत्वावर खरेदीकरिता आवश्यक असलेल्या एकूण रू. ३००.०० लक्ष (रूपये तीनशे लक्ष फक्त) एवढ्या निधीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, पाणी गुणवत्ता तपासणीसाठी नंदूरबार, गडचिरोली आणि अमरावती या तीन जिल्ह्यांकरिता फिरत्या प्रयोगशाळा ( Mobile Laboratory) प्रायोगिक तत्वावर खरेदी करण्याकरिता आवश्यक असलेल्या एकूण रू. ३००.०० लक्ष (रूपये तीनशे लक्ष फक्त) एवढ्या निधीच्या प्रस्तावास, जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण घटकाखालील केंद्र/राज्य हिस्सा निधीमधून, अभियान संचालक (जजीमि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर कार्यालयाच्या संदर्भाधीन क्रमांक ४ येथील आदेशामध्ये नमूद केल्याप्रमाणे आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा पुणे या कार्यालयामार्फत खर्च करण्याच्या प्रस्तावास, सदर आदेशामधील अटी व शर्तीची पुर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या खरेदीसाठी होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (३०) जल जीवन अभियान पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय्य ( केंद्र हिस्सा ६०% ) कार्यक्रम (२२१५ ९९८९) व (राज्य हिस्सा ४०%) कार्यक्रम (२२१५ ९९७१) या लेखाशिर्षाखालील ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१९१७०९३२३६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL NIWRUTTI DHAS

Digitally signed by ANIL NIWRUTTI DHAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F85F1C64C05886C8D514E40D54D27FF3A80FFD907A05433B1C412B7F7FFA0AFD, cn=ANIL NIWRUTTI DHAS
Date: 2024.06.20 15:03:57 +05'30'

**(अनिल धस )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.अध्यक्ष, विधानसभा/मा.सभापती विधान परिषद/मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद.
२. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) मंत्रालय, मुंबई, यांचे खाजगी सचिव.
३. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
४. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
५. आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
६. अभियान संचालक (जजीमि),राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन,बेलापूर
७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक.
८. उप सचिव (जजीमि), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक.
९. कार्यासन पापु-०४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-०१
१०. निवडनस्ती पापु-१२, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई-०१